**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्रमांकः टिआरएन-२०२०/५९/प्र.क्र.१७/उद्योग-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०९ जून, २०२०

संदर्भ:-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.०१.२०१४
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन १११४/प्र.क्र.८३/१४/१८-ब, दिनांक ३.११.२०१४
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन ०५१७/प्र.क्र.३६/सीपीटीपी, दिनांक २१.०७.२०१७
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन ०११९/प्र.क्र.४/सीपीटीपी, दिनांक ८.०४.२०१९
५) शासन निर्णय, उ.ऊ.व का. विभाग क्रमांक इएसटी २०१५/३९८/प्र.क्र.११०/उद्योग-३, दिनांक ७.१०.२०१५
६) शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन २०१९/प्र.क्र.३०/सीपीटीपी-अ, दिनांक ७.०१.२०२०
७) शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन ०६१८/प्र.क्र.५१/सीपीटीपी-ब, दिनांक १७.०१.२०२०
८) शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग क्र. टिआरएन -२०२०/५९/प्र.क्र. १६/उद्योग-३, दिनांक २४.०१.२०२०
९) शासन निर्णय, उद्योग,उर्जा व कामगार विभाग क्र. टिआरएन -२०२०/५९/प्र.क्र. १७/उद्योग-३, दिनांक २४.०१.२०२०

**-: आदेश :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेव्दारे प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण देण्यात येणार आहे. तसेच एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत संदर्भ क्र.२ ते ४ येथील शासन निर्णयान्वये खातेनिहाय संलग्न प्रशिक्षण, जिल्हा स्तरीय प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार या ७३ + ४ आठवडयांच्या प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटपाबाबत मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत.

२. सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या दि.५.३.२०२० व दि.६.३.२०२० च्या पत्रांन्वये सदर परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचे मुळ जिल्हे विभागास कळविले असून विभागास संदर्भ क्र.२ ते ४ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदर अधिकाऱ्यांना जिल्हा स्तरीय प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार या ७३ + ४ = ७७ आठवडयांच्या प्रशिक्षणासाठी त्यांचा मुळ जिल्हा ज्या महसुली विभागामध्ये आहे त्या विभागाव्यतिरिक्त अन्य विभागातील जिल्हयांमध्ये नियुक्ती देण्याबाबतचे निर्देश दिले आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या दि.१३.३.२०२० च्या पत्रान्वये सदर अधिकाऱ्यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी दि.१३.३.२०२० रोजी कार्यमुक्त

केले असून त्यांना दि.१६.०३.२०२० पासून खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी रुजु करुन घेण्याचे निर्देश दिले आहे.

३. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१७ व्दारे उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब या पदासाठी शिफारस केलेल्या **पुढील अ** येथील तक्त्यातील ७ उमेदवारांची उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब या पदावर रकाना क्र. ४ मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकपासून दोन वर्षांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षणासाठी परिविक्षा कालावधीवर सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र. ७ च्या आदेशान्वये तात्पुरती नियुक्ती दिली आहे. तसेच राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१८ व्दारे उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट- अ या पदासाठी शिफारस केलेल्या **पुढील ब** येथील तक्त्यातील २ उमेदवारांची उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट- अ या पदावर रकाना क्र. ४ मध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या दिनांकपासून दोन वर्षांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षणासाठी परिविक्षा कालावधीवर सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्र.६ च्या आदेशान्वये तात्पुरती नियुक्ती दिली आहे. तसेच विभागाच्या संदर्भाधीन क्र. ८ व ९ च्या आदेशान्वये परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ ते ४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना तात्पुरती पदस्थापना देण्यात येत असून त्यांना पुढील प्रमाणे महसुली विभाग व जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

**अ) उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब (राज्यसेवा परीक्षा-२०१७, सीपीटीपी-५)**

| अ.क्र. | परिविक्षाधीन उद्योग अधिकाऱ्यांचे नांव | गुणवत्ता क्र. | रुजू दिनांक | परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणासाठी वाटप करण्यात आलेला महसुली विभाग व जिल्हा | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | विभाग | जिल्हा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. आजगेकर अजिक्य अशोक | १ | ०१.१०.२०१९ | औरंगाबाद | जालना |
| २ | श्री. जैन कमलेशकुमार पारसमल | २ | ३०.०९.२०१९ | पुणे | सातारा |
| ३ | श्री. खिराळे विक्की पुडलिकराव | ३ | ३०.०९.२०१९ | अमरावती | यवतमाळ |
| ४ | श्रीमती विचारे प्रगती किसन | ४ | ३०.०९.२०१९ | नाशिक | नाशिक |
| ५ | श्री. बनसोड संतोष चरणदास | ५ | ३०.०९.२०१९ | अमरावती | अकोला |
| ६ | श्री. मेमाणे सचिन रघुनाथ | ६ | ०१.१०.२०१९ | कोकण-२ | ठाणे |
| ७ | श्रीमती कोकाटे अश्विनी भारत | ७ | ३०.०९.२०१९ | नागपूर | वर्धा |

**ब) उद्योग उपसंचालक (तांत्रिक) गट-अ (राज्यसेवा परीक्षा-२०१८, सीपीटीपी-६)**

| अ.क्र. | परिविक्षाधीन उद्योग उपसंचालकांचे नांव | गुणवत्ता क्र. | रुजू दिनांक | परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना प्रशिक्षणासाठी वाटप करण्यात आलेला महसुली विभाग व जिल्हा | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | विभाग | जिल्हा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री. इंगळे अमोल उत्तमराव | १ | ०२.१०.२०१९ | नाशिक | धुळे |
| २ | श्री. जाधव दिपक बाळासाहेब | २ | ०२.१०.२०१९ | कोकण-२ | मुख्यालय, मुंबई |

४. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त परि.क्र.३ मध्ये नमूद केलेल्या संबधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना दि.१६.०३.२०२० पासून उद्योग संचालनालय, मुंबई येथे रुजू करुन घ्यावे. तसेच परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ७३ + ४ अशा ७७ आठवडयांच्या प्रशिक्षणासाठी वरीलप्रमाणे महसुली विभाग व जिल्हा वाटपानुसार संबधित कार्यालयात रुजु होण्याचे कळविण्यात यावे. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमातील खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण टप्यातील प्रशिक्षण संबंधित प्रशासकीय विभागाने द्यावयाचा प्रशिक्षण कार्यक्रम विहित करण्यात आला असून उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सदर प्रशिक्षण कार्यक्रमाप्रमाणे खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाच्या टप्प्यातील पुढील कार्यवाही करावी.

५. परिवीक्षाधीन अधिकारी यांचे मुल्यमापन करण्यासाठी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१६/प्र.क्र. ५८/सीपीटीपी, दि. ०४.०१.२०१७ मधील निर्देशानुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी विभागाचे नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई यांची राहील. त्यासाठी ज्या विभागीय कार्यालयाच्या कार्यकक्षेतील जिल्हा कार्यालयामध्ये प्रशिक्षणार्थी अधिकारी कार्यरत आहे, त्या उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय यांनी या आदेशासोबत जोडलेल्या **"प्रपत्र - अ"** मध्ये संबधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या प्रशिक्षण कालावधीमधील मुल्यमापन अहवाल समन्वय अधिकारी म्हणून तयार करुन नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई यांना पुढील कार्यवाहीस्तव सादर करावा.

६. सदरहू परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशिक्षण कालावधीमधील टप्पा क्र. ५ मधील खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण पुर्ण करणे अनिवार्य आहे.

१) प्रशिक्षण कालावधीमध्ये परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१३.११.२०१७ अन्वये विहीत केल्यानुसार रजा अनुज्ञेय राहतील. प्रशिक्षण कालावधीमध्ये त्यांची वर्तणूक समाधानकारक असावी.
२) वर नमूद केलेल्या शर्ती व्यतिरिक्त सर्वसाधारणपणे राज्यसेवा गट-अ व गट-ब च्या अधिकाऱ्यांसाठी महाराष्ट्र शासनाने विहीत केलेले इतरही सेवा नियम या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना लागू असतील व त्या नियमांचे पालन करणे त्यांना बंधनकारक राहील. तसेच संदर्भ क्र. ६ व ७ येथील अटी लागू राहतील.
३) प्रशिक्षण कालावधीत परिविक्षाधीन अधिकारी यांनी त्यांची दैनंदिन रोजनिशी ठेवावी व ती अद्ययावत ठेवावी.
४) ज्या महसुली विभागामध्ये परिविक्षाधीन अधिकारी कार्यरत आहे त्या विभागाच्या सहसंचालक, विभागीय कार्यालय यांनी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांवर प्रत्यक्ष नियंत्रण ठेवावे तसेच, त्यांनी केलेल्या कामकाजाचे मुल्यमापन करावे. तसेच, प्रत्येक महिन्यास त्याचा अहवाल प्रमाणित करुन नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय यांना पुढील कार्यवाहीस्तव सादर करावा.
५) प्रशिक्षण कालावधीत परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी गैरवर्तन केल्याचे अथवा प्रशिक्षण पुरेशा गांर्भीर्याने घेत नसल्याचे निदर्शनास आल्यास असा अहवाल त्वरीत संबधित सहसंचालक, विभागीय कार्यालय यांनी विकास आयुक्त (उद्योग) यांच्या निदर्शनास आणून देण्यासाठी नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी यांच्याकडे विनाबिलंब पाठवावा. तसेच गैरवर्तनाची नोंद संबंधितांच्या वैयक्तीक सेवा अभिलेखात नोंदवाव्यात.

६) उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र. ८ व ९ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या कालावधीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली असून परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना विकास आयुक्त (उद्योग) यांनी वाटप केलेल्या संबधित कार्यालयामार्फत वेतन व भत्ते अदा करावेत.

७) परिविक्षाधीन अधिकारी यांना जिल्हास्तरीय प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार (७३ + ४ = ७७ आठवडयांच्या) कालावधीसाठीच जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

८) परिविक्षाधीन अधिकारी यांनी प्रशिक्षणासाठी वाटप केलेल्या जिल्हयात रुजू झाल्यानंतर त्याबाबतचा अनुपालन अहवाल महासंचालक, यशदा, पुणे, संचालक, वनामती, नागपूर, विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय व शासनास सादर करावा.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०९१६१८४८५४१० असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Namdeo Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2020.06.09 16:57:32 +05'30'

**( डॉ. ना.कों.भोसले )**

**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई
७. उपसचिव (सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
९. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
१०. सर्व उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालये
११. सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. उप सचिव( प्रशा-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई (आवश्यक त्या कार्यवाहीस्तव अग्रेषित)
१५. जिल्हा कोषागार कार्यालय, जालना, सातारा, यवतमाळ, ठाणे, अकोला, नाशिक, वर्धा व धुळे
१६. सर्व संबधित प्रशिक्षणार्थी अधिकारी (उद्योग संचालनालयामार्फत)
१७. निवडनस्ती.

**कार्यालयीन आदेश क्रमांक टिआरएन-२०२०/५९/प्र.क्र.१७/उद्योग-३ दि. ९ जून, २०२० सोबतचे**

**प्रपत्र "अ"**

परिविक्षाधीन कालावधीतील मुल्यमापन अहवाल

परिविक्षाधीन अधिका-याचे नाव :

| घटक | प्रतवारी | | |
|---|---|---|---|
| | उत्कृष्ट (३ गुण) | चांगली (२ गुण) | साधारण (१ गुण) |
| अ) बौध्दिक क्षमता | | | |
| १. कामासाठी आवश्यक असलेले तांत्रिक ज्ञान | | | |
| २. विश्लेषणात्मक कार्यक्षमता | | | |
| ३. चौकस वृत्ती | | | |
| ४. भाषेवर प्रभूत्व | | | |
| ५. चर्चेमध्ये भाग घेण्याची कार्यक्षमता | | | |
| ६. जबाबदारीची जाणीव | | | |
| ७. संगणक ज्ञान | | | |
| ब) कामाच्या सवयी व कामाबाबतचा दृष्टीकोन | | | |
| १. कामातील रुची व प्रवृत्त | | | |
| २. पुढाकार | | | |
| ३. आत्मविश्वास | | | |
| ४. परिपूर्णता | | | |
| ५. वक्तशीरपणा | | | |
| ६. कामामधील तत्परता | | | |
| क) स्थिरता | | | |
| १. समतोलता | | | |
| २. रास्तपणा | | | |
| ३. अवलंबिता | | | |
| ड) खालील बाबतीतील कार्यक्षमता | | | |
| १. चातुर्य-कसब | | | |
| २. सहकर्मचारी, सहकारी व जनता यांच्याबद्दलची सहकार्य करण्याची क्षमता | | | |
| ३. इतरांना प्रोत्साहन देण्याची क्षमता | | | |

| | | | |
|---|---|---|---|
| ई) व्यवस्थापन करण्याची क्षमता | | | |
| १. निर्णय क्षमता | | | |
| २. नियोजन व कार्यक्रम आखण्याची क्षमता | | | |
| ३. मार्गदर्शन व नियंत्रण | | | |
| ४. वैयक्तिक आणि प्रकल्प किंवा योजनांच्या कामांचे मुल्यमापन करण्याची क्षमता | | | |

| | उत्कृष्ट (६ गुण) | चांगली (४ गुण) | साधारण (२ गुण) |
|---|---|---|---|
| फ) प्रशिक्षण कालावधीचे मुल्यांकन | | | |
| एकूण गुण | | | |

परिविक्षाधीन अधिकाऱ्याचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करावा किंवा वाढवावा याबद्दल तसेच त्यांच्या चांगल्या आणि वाईट गुणांबद्दल (विशेषत: सचोटी व क्षमता याबाबत) सर्वसाधारणपणे केलेले मूल्यमापन/मूल्यांकन.

समन्वय अधिकाऱ्याची सही / नाव व पदनामासह

उपरोक्त प्रशिक्षणार्थी उमेदवार मुख्यालयात तसेच विभागीय कार्यालयात प्रशिक्षणासाठी दाखल झाल्यानंतर सेवार्थप्रणालीत त्यांचा समावेश होत असल्याने त्यांना पदाचे नियमित वेतन (घरभाडे भत्ता/शहर पूरक भत्ता समाविष्ट) अदा करण्यात येणार आहे, त्यामुळे खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण कालावधीत त्यांच्या निवासाची व्यवस्था उमेदवारांनी स्वत: करावयाची आहे.

***************